केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियान
**कोल्हापूर शहराच्या पाणीपुरवठा प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**
(२०१६-१७)

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- अमृत-२०१७/प्र.क्र. ३१४/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांकः- १२ जुलै, २०१७

वाचा:-

१. शासन निर्णय नगर विकास विभाग क्र: अमृत-२०१५/प्र. क्र.१९७/नवि३३, दिनांक १३ ऑक्टोबर, २०१५.
२. शासन परिपत्रक क्र. नगर विकास विभाग क्र: अमृत-२०१६/प्र.क्र.१६३/नवि-३३, दिनांक १६ मे, २०१६ व १२ जुलै, २०१६.

प्रस्तावना:-

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाची अंमलबजावणी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्यामध्ये **सन २०१६-१७** वर्षापासून राज्यामध्ये करण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत पाणीपुरवठा, मलनिस्सारण, पर्जन्यजलवाहिनी, नागरी परिवहन व हरित क्षेत्र विकास इ. पायाभूत सुविधांची निर्मिती अभियान शहरांमध्ये करण्यात येणार आहे. त्यानुसार सदर अभियानांतर्गत **सन २०१६-१७** या आर्थिक वर्षामध्ये राज्याच्या रु. २४८९.९१ कोटी किंमतीच्या आराखडयास केंद्र शासनाने मान्यता दिलेली असून सदर आराखडयामध्ये **कोल्हापूर शहराच्या पाणीपुरवठा प्रकल्पाचा** समावेश आहे.

०२. अमृत अभियानांतर्गत **सन २०१६-१७** या आर्थिक वर्षाच्या आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या पाणीपुरवठा प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवालास शासनाच्या मान्यतेच्या अनुषंगाने अमृत अभियानाच्या **सन २०१६-१७** या आर्थिक वर्षाच्या राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या **कोल्हापूर शहराच्या पाणीपुरवठा प्रकल्पास** प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत **सन २०१६-१७** या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनाकडून मंजूर केलेल्या राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या **कोल्हापूर शहराच्या पाणीपुरवठा प्रकल्पास** संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतुदीच्या अधीन राहून खालील परिच्छेद क्र. २ मधील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

०२. **कोल्हापूर शहर पाणीपुरवठा प्रकल्पातील** उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

| Sr. No. | Name of Work | Amount (In Rs.) |
|---|---|---|
| 1 | Working Survey | 5,00,000 |
| 2 | Gravity Mains (200 to 1100mm DI K-7 pipe L=8.16 Km) | 6,60,79,301 |
| 3 | Rising Mains (250 to 450 mm DI K-9 pipe L=10.75 Km) | 4,96,36,435 |
| 4 | Pumping Machinery with SCADA System Automation (Total 490 BHP @ Bawada Sump, Rajendra Nagar, Puikhadi Sump) | 5,81,53,012 |

| | | |
|---|---|---|
| 5 | Proposed ESR's at Kadamwadi (17.00 lakh liters) Samrat Nagar (13.50 lakh liters), Tarabai Park (16.10 lakh liters), Rajendra Nagar (9 lakh liter), Rajarampuri Cyber (18 lakh liters), Rajarampuri Lucky Bazar (10.10 lakh liters), Wash water ESR at Bawada WTP (7 lakh liters), Bondre Nagar (13.50 lakh liters), Puikhadi (20 lakh liters), Shivaji Park (8 lakh liters), Aaptenagar (18.30 lakh liters), Bawada (10 lakh liters), Proposed Sump at Kasba Bawda WTP (24 lakh liters), Sump at subhash Nagar (10.75 lakh liters), Sump at Rajendra Nagar (3.40 Lakh liters). | 12,97,07,409 |
| 6 | Distribution System | |
| a. | New Pipeline (110 to 250 HDPE L-318.34 Km, 300 to 750 DI K-7 L=2.83 Km) Total L=349.07 Km | 70,80,82,134 |
| b. | Replacement of pipes (110 to 250 HDPE L=44.43 Km, 300 to 450 DI K-7 L=2.83 Km) Total L=47.26 Km | 8,58,87,795 |
| 7 | Pump House (at Subhash Nagar, Rajendra Nagar, Kasba Bawada) | 58,39,418 |
| 8 | Miscellaneous Works | |
| a. | Repairs to existing ESRs, at Tarabai Park, Kalamba Filter, Bawada WTP, Rajendra Nagar and Sump at kalamba Filter. | 1,75,80,725 |
| b. | Repairs to remaining existing ESRs, UCR Compound wall, Chain link fencing and Gate for Existing and Proposed Structures etc. | 2,66,08,297 |
| | **Total** | **1,14,80,74,526** |
| | **Say Rs.** | **114.80** |
| | **प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी** | **कार्यादेश दिल्या पासून २४ महिने** |

**०३. कोल्हापूर शहर पाणीपुरवठा योजनेचा** केंद्र शासनाकडून मंजूर राज्य वार्षिक कृति आराखडयानुसार वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | महानगर पालिकेचे नाव | योजनेची मंजूर किंमत (डीपीआर नुसार) | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ५०%) | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या २५%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या २५%) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | कोल्हापूर महानगर पालिका | रु. ११४.८० कोटी | रु. ५७.४० कोटी | रु. २८.७० कोटी | रु. २८.७० कोटी |

**०४.** संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार **कोल्हापूर शहर पाणीपुरवठा प्रकल्पास** खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे:-

४.१ सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा **कोल्हापूर महानगरपालिका** राहील.

४.२ प्रकल्पासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा **कोल्हापूर महानगरपालिकेमार्फत** भरण्यात यावा.

४.३ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन शासन निर्णयानुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.४ राज्य शासनाने शासन परिपत्रक क्रमांक अमृत -२०१६/प्र.क्र. १६३/नवि-३३, दिनांक १६ मे, २०१६ व १२ जुलै, २०१६ नुसार विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया व अंमलबजावणी विहित कालावधीमध्ये पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील. तसेच या प्रकल्पासाठी डी. आय. पाईप्ससह सर्व प्रकारच्या पाईप्सचा देखील निविदेत समावेश करण्यात यावा.

४.५ सदर प्रकल्पाच्या निविदा या महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने अमृत अभियानातील पाणीपुरवठा प्रकल्पांसाठी निर्गमित केलेल्या नमुना निविदा प्रपत्रानुसार करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.६ सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश प्रशासकीय मंजूरीच्या आदेशापासून ४५ दिवसांच्या आत देण्यात येतील याची कार्यान्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४.७ केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत केंद्र शासनाने विहित केलेल्या सुधारणांची (Reforms) पूर्तता विहित कालावधीत पूर्ण करणे संबंधित अभियान शहरास बंधनकारक राहील.

४.८ **निधी वितरणाची कार्यपद्धती:-** केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार केंद्र शासन हिश्याचा निधी हा तीन टप्यात (२० टक्के + ४० टक्के + ४० टक्के) वितरीत केला जाणार आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडून वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य हिश्याचा निधी केंद्र हिस्सा वितरीत करताना सोबत वितरीत केला जाईल.

४.९ अमृत अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना नागरी स्थानिक स्वराज संस्थांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या १४ व्या वित्त आयोगाच्या निधीशी एककेंद्राभिमुख (Convergence) करणे आवश्यक राहील. यासाठी त्यांनी १४ वा वित्त आयोगातून मिळणारा निधी चिन्हांकीत करून ठेवावा.

४.१० सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिश्याचा प्रथम हप्त्याचा निधी या प्रकल्पाचे कार्यादेश दिल्यानंतरच वितरीत करण्यात येईल. त्यानुसार केंद्र शासनाने विहित केल्यानुसार उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर केलेनंतर पुढील हप्त्याचा केंद्र हिश्याचा व त्याप्रमाणात राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

४.११ अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्था हिश्याचा निधी उभा करून सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात शासनास सादर करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक असणार आहे.

४.१२ सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी प्राप्त निधी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहीत केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील. सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

४.१३ राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

४.१४ सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीत पूर्ण करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१५ प्रकल्पाचे काम सुरु झालेनंतर प्रकल्प व्यवस्थापक सल्लागाराने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केलेनंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१६ अमृत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार सदर प्रकल्पासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापक सल्लागार म्हणून कार्य करील. त्यापोटी कार्यान्वयन यंत्रणा ३ टक्के इतके शुल्क शासनामार्फत विहीत करण्यात येणाऱ्या कार्यपध्दतीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास अदा करेल, तसा ठराव महानगरपालिकेने करणे बंधनकारक राहील.

४.१७ सदर प्रकल्प पूर्ण करण्यासाठी आवश्यक असलेली सर्व ना हरकत प्रमाणपत्रे प्रकल्पास कार्यादेश देण्यापूर्वी मिळविण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

४.१८ प्रकल्प शाश्वत होण्याच्या अनुषंगाने सदर प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये नमूद केलेप्रमाणे पाणीपुरवठा कराची आकारणी करणेबाबत महासभेची मान्यता घेऊन त्याअनुषंगाने आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१२१५०८०७०४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.07.13 12:42:55 +05'30'

**( पां.जो.जाधव )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) विभाग यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
५. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव, पाणी पुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
९. आयुक्त तथा संचालक ,नगरपरिषद प्रशासन संचालनालय ,मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
११. आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर, जि. कोल्हापूर
१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई.
१३. जिल्हाधिकारी, कोल्हापूर
१४. जिल्हा प्रशासन अधिकारी, कोल्हापूर
१५. अधिक्षक अभियंता, मध्यवर्ती नियोजन संकल्पचित्र व सनियंत्रण, मजीप्रा, कोपरी, ठाणे.
१६. निवडनस्ती, नवि-३३.